सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांच्या आस्थापनेवर २१ काल्पनिक पदे निर्माण करुन ती बाहययंत्रणेद्वारे भरण्यास मंजूरी देण्याबाबत....,

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : सवऔ-२८१६/प्र.क्र.१६०/१६/का-८,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- १८ एप्रिल, २०२२

वाचा:- १) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.संकिर्ण१००६/६०१/(प्र.क्र९५)/का.८, दि.१५.०२.२००७

२)विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२८१६/प्र.क्र.१६०/१६/का.८, दि.०७.०२.२०२०

३) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२८१६/प्र.क्र.१६०/१६/का.८, दि.२६.०३.२०२१

४) सह सचिव, विधि व न्याय विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र.आस्था-२०२२/प्र.क्र.०१/१४७, दि.१८.०१.२०२२

५) उप सचिव, वित्त विभाग यांचे पत्र क्र. पदनि-२०२२/प्र.क्र.१४/आपुक, दि.११.०४.२०२२

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय दि.१५.२.२००७ अन्वये कार्यासन-८ च्या अधिपत्याखालील १३ सरकारी वकील कार्यालयांचा आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधानुसार सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांच्या कार्यालयातील मंजूर पदांची संख्या ७० इतकी आहे. रिट याचिका क्र.५८२४/२०१६ मध्ये दि.२७.४.२०१७ रोजी झालेल्या सुनावणीच्या वेळी मा. उच्च न्यायालयाने अतिरिक्त पदे निर्माण करुन ती ६ महिन्यांच्या आत भरण्याबाबत आदेश दिलेले होते. त्यानुषंगाने उच्चास्तरीय समितीच्या मान्यतेने विविध संवर्गात अतिरिक्त २२ नियमित पदे व २५ काल्पनिक पदे निर्माण करुन ती नियमित स्वरुपात/बाहययंत्रणेच्या माध्यमातून भरण्यास, दि.१४ जून , २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली होती. अशा प्रकारे सदर कार्यालयातील मंजूर पदांची संख्या ९२ नियमित पदे व २५ काल्पनिक पदे अशी आहे.

२. सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयात सरळसेवा व पदोन्नतीच्या कोटयात एकूण ४५ पदे रिक्त असल्याने सदर पदे बाहय यंत्रणेच्या माध्यमातून भरण्यास मंजूरी देण्याची विनंती संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी केलेली होती. त्याअनुषंगाने सदर कार्यालयातील एकूण ४५ रिक्त पदे बाहययंत्रणेद्वारे भरण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला. वित्त विभागाने सदर कार्यालयातील सरळसेवेच्या कोटयातील २१ रिक्त पदे बाहययंत्रणेद्वारे भरण्याबाबतचा प्रस्ताव उपसमितीच्या दि.२४.०३.२०२२ रोजीच्या बैठकीत मान्यतेसाठी सादर केला व सदर प्रस्तावास उपसमितीने मान्यता दिली.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उपसमितीच्या दि.२४.०३.२०२२ रोजी पार पडलेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार, सरकारी वकीलांच्या कार्यालयांचा सुधारित आकृतिबंध मंजूर होईपर्यंत अथवा एक वर्ष यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीसाठी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद या कार्यालयातील सरळसेवेच्या कोटयातील रिक्त असलेली खालील तक्त्यात नमूद २१ काल्पनिक पदे निर्माण करुन त्या पदांच्या सेवा बाहययंत्रणेद्वारे घेण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | काल्पनिक पदे | मनुष्यबळ संख्या |
|---|---|---|
| १ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | २ |
| २ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | ४ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | ५ |
| ४ | शिपाई | १० |
| **बाहययंत्रणेचे एकूण मनुष्यबळ** | | **२१** |

२. उपसमितीने वरील काल्पनिक पदे निर्माण करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता दिलेली आहे. :-

i) उच्चस्तरीय सचिव समितीने सरकारी वकीलांचे कार्यालयाच्या सुधारित आकृतीबंधास मंजूरी दिल्यानंतर सहा महिन्यांच्या आत रिक्त पदे भरण्याची कार्यवाही करण्यात यावी.

ii) सदरहू कार्यालयातील पदांवर पदोन्नतीसाठी निम्नसंवर्गातून पदे उपलब्ध होत नसल्यामुळे विभागाने

सरकारी वकीलांचे कार्यालयातील पदांचे स्वतंत्र सेवाप्रवेश नियम तयार करावेत.

३. बाहययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी शासन परिपत्रकान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, बाहययंत्रणेकडून सेवा उपलब्ध करुन घेताना प्रचलित कायदयाचा भंग होणार नाही याची काळजी कार्यालय प्रमुखांनी घ्यावी.

४. यावर होणारा खर्च "मागणी क्र.जे-०१, लेखाशीर्ष २०१४, न्यायदान, ११४, विधि सल्लागार व समुपदेशी (००) (०१) विधि सल्लागार व समुपदेशी, (शहर अधिकारी) (दत्तमत) (अनिवार्य) १०-कंत्राटी सेवा (२०१४ ०२९९)" खाली खर्ची टाकून तो चालू सन २०२२-२०२३ वर्षातील मंजूर व वितरित केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम (भाग-२), दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१ ला उपविभाग-४, अनुक्रमांक ११ मधील तरतुदीनुसार, तसेच, वित्त विभाग शासन निर्णय दि.०९.०६.२०१७ अन्वये गठित, अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या उपसमितीच्या दि.२४.०३.२०२२ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२२१६१८०७८११२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Swati Suresh Lohar
Date: 2022.04.22 16:19:24 +05'30'

**( स्वा. सु. लोहार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव व विधि परामर्शि , विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सह सचिव (कार्या.८), विधि व न्याय विभाग ,मंत्रालय मुंबई
४. सह सचिव, विधि व न्याय विभाग , मंत्रालय मुंबई , शाखा औरंगाबाद, जुनी उच्च न्यायालय इमारत , अदालत रोड, औरंगाबाद.
५. महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखा परीक्षा)(लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
६.सरकारी वकील, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
८. वित्त विभाग (आपुक)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. कक्ष अधिकारी (कार्यासन-२३), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. निवडनस्ती/का.८

..........................................................